व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्था व कार्यालयातील ज्या कर्मचाऱ्यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि. ०८/०३/१९९९ अन्वये नियमित करण्यात आल्या आहेत त्यांच्या पुर्वीच्या अभावित सेवा वेतननिश्चितीसाठी ग्राह्य धरुन मुळ नियुक्ती दिनांकापासून वेतननिश्चिती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय: संकीर्ण-२०२४/प्र.क्र. २७२/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९९/प्र.क्र. ६/९९/बारा, दि. ०८/०३/१९९९

(२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. टिएसए-१०९७/११८९/व्यशि-२, दि. १९/०३/१९९९

(३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग पत्र क्र. टिएसए-१०९९/६५१४३/२००२/व्यशि-२, दि. १३/१२/१९९९

**प्रस्तावना:**

प्रादेशिक दुय्यम सेवा निवडमंडळे/जिल्हा निवड समित्या/ सेवायोजन कार्यालय यांच्या कार्यकक्षेतील अनियमित नियुक्त्या "एक वेळची बाब" म्हणून सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये त्यामधील अटींच्या अधीन राहून नियमित करण्यात आल्या होत्या. सदर शासन निर्णयास अनुसरून उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयन्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था / तंत्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक, शिक्षकेतर पदांवर अस्थायी स्वरुपात कार्यरत असलेल्या १०६१ कर्मचा-यांना शासनसेवेत नियमित करण्यात आले होते. तसेच सदर शासन निर्णयास अनुसरुन उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये ५२२ कर्मचाऱ्यांना शासन सेवेत नियमित करण्यात आले होते. तसेच सदर शासन निर्णयात अभावित नियुक्तीचा फायदा कुठल्याही प्रयोजनार्थ / कारणासाठी देण्यात येणार नाही, असे नमूद करण्यात आले होते.

या अनुषंगाने श्री. उमेश नारायण यादव व इतर शिल्प निदेशक, गट निदेशक यांनी "सेवा नियमिततेच्या पूर्वीच्या सेवेतील खंड वेतनवाढीसाठी ग्राह्य धरण्याबाबत तसेच सेवांतर्गत योजनेचे लाभ मंजूर करणेबाबत" या मागण्यांसाठी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. २९७/२०१५ दाखल केला होता. सदर प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि. २५/०८/२०२२ रोजीच्या आदेशान्वये अर्जदारांनी वित्त विभाग तसेच कौशल्य विकास विभागास निवेदन सादर करावे व सदर निवेदन विचारात घेऊन कौशल्य विकास विभागाने आणि वित्त विभागाने निर्णय घ्यावा व तसे अर्जदारास कळवावे असे अंतिम आदेश दिले आहेत. सदर आदेशाच्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातून ज्या कर्मचाऱ्यांच्या सेवा दि. ०८/०३/१९९९ रोजीच्या शासन निर्णयानुसार नियमित करण्यात आल्या आहेत त्यांच्या पुर्वीच्या अभावित सेवा वेतननिश्चितीसाठी ग्राह्य धरुन मुळ नियुक्ती दिनांकापासून वेतननिश्चिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील संस्था व कार्यालयातील ज्या कर्मचाऱ्यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. ०८/०३/१९९९ व संदर्भ क्र. (३) येथील दि. १३/१२/१९९९ रोजीच्या पत्रान्वये नियमित करण्यात आल्या आहेत त्या कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्यापुर्वीची अभावित सेवा वेतननिश्चितीसाठी ग्राह्य धरण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

(i) सेवा नियमित केलेल्या कर्मचाऱ्यांची मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करणे.

(ii) महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ च्या नियम क्र. ३६ व ३९ नुसार वेतनवाढ अनुज्ञेय करणे. (तांत्रिक खंड क्षमापित करुन)

(iii) सेवा नियमित केलेल्या कर्मचाऱ्यांची संबंधित पाचवा, सहावा व सातवा वेतन आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करणे

(iv) या अनुषंगाने देय ठरणाऱ्या फरकाच्या रकमा अदा करणे.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या (१२/(सेवा-३)) सहमतीने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ६४/२४/सेवा-३, दि. २३/०२/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१६१२५७५८८००३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANOJ DATTATRAY JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATRAY JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2766AFDA86350272237DCF9A191545970F7F12E66D0605C664CA2BF0F3001DC0, cn=MANOJ DATTATRAY JADHAV
Date: 2024.08.16 13:17:24 +05'30'

**( मनोज जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव, सामान्य शासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर.
६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११) संबंधित अधिकारी (संचालनालयामार्फत)
१२) निवडनस्ती (व्यशि-१)